**दिनांक ११.५.२०११ रोजी आंतरराष्ट्रीय रस्ता सुरक्षा दिन साजरा करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

गृह विभाग
परिपत्रक क्र. टिआरए ०५११/प्र.क्र. ३०२/पोल-८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३ मे, २०११.

पहावे :- १) अपर पोलीस महासंचालक (वाहतूक) यांनी मा. मंत्री (गृह) यांना पाठविलेले पत्र क्र. ९९५/अपोमसं/वा/रसुदि/११, दि. ३०.४.२०११

संयुक्त राष्ट्र संघटना (UNO) च्या परिषदेमध्ये रस्त्यावरील अपघात कमी करण्यासाठी व होणाऱ्या अपघातांना करण्यासाठी सन २०११-२०२० हे दशक **'रस्ता सुरक्षा दशक'** म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्याचाच एक भाग म्हणून दिनांक ११.५.२०११ हा **'आंतरराष्ट्रीय रस्ता सुरक्षा दिन'** म्हणून साजरा करण्यात यावा असे संयुक्त राष्ट्र संघटना (UNO) ने निर्देश दिले असल्याने महाराष्ट्र शासनाच्या वतीने दि. ११.५.२०११ रोजी आंतरराष्ट्रीय रस्ता सुरक्षा दिन साजरा करण्यात येत आहे.

आंतरराष्ट्रीय रस्ता सुरक्षा दिनानिमित्त दि. ११.५.२०११ रोजी संबंधित विभागांनी खालील प्रमाणे कार्यक्रमाचे आयोजन करण्याबाबत शासन याद्वारे निदेश देत आहे.

| अ.क्र. | कार्यक्रम | अंमलबजावणी विभाग |
|---|---|---|
| १ | वाहन चालक व माल प्रबोधन व जनजागृती बॅनर्स (पोस्टर्स, पुस्तिका, हॅण्डबिल, भित्तीपत्रकांचे वाटप) | १) महामार्ग पोलीस विभाग,<br>२) पोलीस विभाग, वाहतूक शाखा,<br>३) परिवहन विभाग,<br>४) सार्वजनिक आरोग्य विभाग. |
| २ | रक्तदान (अपघातातील जखमींना मदत होण्याकरीता) | |
| ३ | वाहनांना, बैलगाड्या, सायकलना रिफ्लेक्टर लावणे. | |
| ४ | विशेष माहिम :-<br>१) लेन कटींग<br>२) अती वेगाने वाहन चालविणाऱ्या वाहनचालकांविरुध्द कारवाई.<br>३) ड्रंक ॲण्ड ड्राईव्ह केसेस. | |
| ५ | ब्लॅक स्पॉट फलक, साईनबोर्ड, ब्लिंकर्स व अपघाताबाबत माहिती फलक लावणे | सार्वजनिक बांधकाम विभाग |

वरीलप्रमाणे कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी पोलीस आयुक्त, परिवहन आयुक्त, जिल्हा पोलीस अधीक्षक व प्रादेशिक परिवहन अधिकारी, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, यांनी पुढाकार घेऊन रस्ता सुरक्षा दिन त्यांच्या जिल्ह्यात आयोजित करावा. तसेच, आंतरराष्ट्रीय रस्ता सुरक्षा दिनानिमित्त आयोजित केलेल्या कार्यक्रमाचा पूर्तता अहवाल दिनांक १४.५.२०११ पावेतो अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सादर करावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल आदेशानुसार व नावाने.

(अ.न. नाईकनवरे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग,

प्रति,

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग. मंत्रालय, मुंबई.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) प्रधान सचिव, (परिवहन),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७) सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक (परिक्षेत्र)
८) सर्व पोलीस आयुक्त.
९) सर्व पोलीस अधीक्षक.
१०) निवडनस्ती (आस्था-३)
११) निवडनस्ती (पोल-८)